सन २०२१-२२ या शैक्षणिक वर्षामध्ये अनुसूचित जमातीच्या विद्यार्थ्यांना इंग्रजी माध्यमाच्या नामांकित निवासी शाळांमध्ये शिक्षण देण्याकरिता संस्था/शाळांची निवड करण्याबाबत.

अपर आयुक्त, आदिवासी विकास, नागपूर

महाराष्ट्र शासन

आदिवासी विकास विभाग

**शासन निर्णय क्रमांक :- नानिशा-२०२०/प्र.क्र.७०/का.१२**

हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा रोड,

मंत्रालय, मुंबई-४०० ०३२

दिनांक :- ०३ डिसेंबर, २०२१

वाचा :-

१) आदिवासी विकास विभाग, शासन निर्णय क्रमांक शाआशा-२००८/प्र.क्र.८१/ कार्या-१३, दिनांक २८.०८.२००९.

२) आदिवासी विकास विभाग, शासन निर्णय क्रमांक नानिशा-२०१६/प्र.क्र.२८०/ कार्या-१२, दिनांक २९.०५.२०१७.

३) आदिवासी विकास विभाग, शासन निर्णय क्रमांक नानिशा-२०१८/प्र.क्र.२१/ कार्या-१२, दिनांक १८.०५.२०१८

४) आदिवासी विकास विभाग, शासन शुध्दीपत्रक क्रमांक नानिशा-२०१८/प्र.क्र.२१/ कार्या-१२, दिनांक ०९.०६.२०१८.

५) शासन पत्र क्रमांक अर्थसं-२०२०/प्र.क्र.४२/का-१२, दिनांक २६.०३.२०२१.

६) शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, शासन परिपत्रक क्रमांक संकीर्ण-२०२१/प्र.क्र.९४/ एसडी-६, दिनांक ०७.०७.२०२१.

७) शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, शासन परिपत्रक क्रमांक संकीर्ण-२०२१/ प्र.क्र.११३/एसडी-६, दिनांक १०.०८.२०२१.

८) शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, शासन परिपत्रक क्रमांक संकीर्ण-२०२१/ प्र.क्र.११३/एसडी-६, दिनांक २४.०९.२०२१.

९) शासन पत्र क्रमांक नानिशा-२०२०/प्र.क्र.७०/कार्या-१२, दिनांक १९.०७.२०२१ अन्वये निर्गमित सचिवस्तरीय समितीच्या बैठकीचे इतिवृत्त.

प्रस्तावना:-

अनुसूचित जमातीच्या विद्यार्थ्यांना शहरातील इंग्रजी माध्यमाच्या नामांकित निवासी शाळांमध्ये शिक्षण देण्याबाबतची योजना संदर्भ क्रमांक १ येथील दि. २८.०८.२००९ रोजीच्या शासन निर्णयान्वये राज्यात राबविण्यात येत आहे. तसेच सदर योजनेंतर्गत निवड करण्यात आलेल्या नामांकित शाळांमध्ये शिक्षण घेत असलेल्या इतर विद्यार्थ्यांसमवेत योजनेंतर्गत प्रवेशित अनुसूचित जमातीच्या विद्यार्थ्यांची शैक्षणिक प्रगती अधिक चांगली होण्याच्या दृष्टीने सन २०१७-१८ या शैक्षणिक वर्षापासून इयत्ता १ ली व इयत्ता २ री या सुरुवातीच्या टप्प्यामध्ये प्रवेश देण्याबाबत संदर्भ क्रमांक २ येथील दि. २९.५.२०१७ रोजीच्या शासन निर्णयान्वये मान्यता देण्यात आलेली आहे. सदर योजना अंमलबजावणीमध्ये सुसूत्रता आणण्याकरिता

शाळेमध्ये उपलब्ध शैक्षणिक व निवासी सोयी सुविधा आणि त्याच्या दर्जानुसार गुणांकन निश्चित करून प्राप्त गुणांकनानुसार शाळांची निवड करणे व शाळांना द्यावयाचे शुल्क निर्धारित करण्याकरिता संदर्भ क्रमांक ३ येथील दि. १८.०५.२०१८ व संदर्भ क्रमांक ४ येथील दि. ०९.०६.२०१८ रोजीच्या शासन शुद्धीपत्रकान्वये सुधारित धोरण ठरविण्यात आलेले आहे.

२. कोविड-१९ या विषाणूच्या प्रादुर्भावामुळे राज्यात लॉकडाऊन असल्यामुळे संपुर्ण शैक्षणिक संस्था सन २०२०-२१ या काळात काही कालावधीसाठी बंद होत्या. त्या अनुषंगाने नामांकित निवासी शाळांना देयके अदा करण्याच्या अनुषंगाने संदर्भाधिन क्रमांक ५ येथील दिनांक २६.०३.२०२१ रोजीच्या पत्रान्वये मान्यता देण्यात आलेली आहे. त्याअन्वये सन २०२०-२१ या शैक्षणिक वर्षात जून्या नामांकित निवासी शाळांना कायम करण्यात आल्याचे समजण्यात येत आहे.

३. कोविड-१९ या विषाणूच्या प्रादुर्भावामुळे राज्यात सन २०२१ मध्ये पुन्हा लॉकडाऊन लागू करण्यात आला. त्यामुळे राज्यातील संपूर्ण शैक्षणिक संस्था काही कालावधीसाठी बंद होत्या. शालेय शिक्षण व क्रीडा विभागाच्या संदर्भाधिन क्रमांक ६ च्या शासन परिपत्रक दिनांक ०७.०७.२०२१ अन्वये दिनांक १५.०७.२०२१ पासून राज्यातील कोविड मुक्त क्षेत्रात इयत्ता ८ वी ते इयत्ता १२ वी चे वर्ग सुरु करण्यास मान्यता देण्यात आली आहे. तसेच शालेय शिक्षण व क्रीडा विभागाच्या संदर्भाधिन क्रमांक ७ च्या शासन परिपत्रक दिनांक १०.०८.२०२१ अन्वये दिनांक १७.०८.२०२१ पासून राज्यातील ग्रामीण भागात इयत्ता ५ वी ते इयत्ता ७ वी चे वर्ग व शहरी भागातील इयत्ता ८ वी ते इयत्ता १२ वी चे वर्ग सुरु करण्यास मान्यता देण्यात आली आहे. त्याचप्रमाणे शालेय शिक्षण व क्रीडा विभागाच्या संदर्भाधिन क्रमांक ८ च्या शासन परिपत्रक दिनांक २४.०९.२०२१ अन्वये दिनांक ०४.१०.२०२१ पासून राज्यातील ग्रामीण भागातील इयत्ता ५ वी ते इयत्ता १२ वी चे वर्ग व शहरी भागातील इयत्ता ८ वी ते इयत्ता १२ वी चे वर्ग सुरक्षितपणे सुरु करण्यास मान्यता देण्यात आली आहे.

४. उपरोक्त वस्तूस्थिती पाहता नामांकित योजने अंतर्गत चालू शैक्षणिक वर्ष सन २०२१-२२ करिता सदर योजनेअंतर्गत यापूर्वी निवड करण्यात आलेल्या जुन्या शाळांना कायम करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**<u>शासन निर्णय</u>**:-

कोविड-१९ विषाणूच्या प्रादुर्भावामुळे राज्यात लॉकडाऊन लागू करण्यात आला होता. त्यामुळे राज्यातील संपूर्ण शैक्षणिक संस्था काही कालावधीसाठी बंद होत्या. नामांकित निवासी शाळा योजनेंतर्गत सन २०२१-२२ या शैक्षणिक वर्षात शाळांची निवड करण्याबाबत दिनांक १४.०७.२०२१ रोजी बैठक आयोजित करण्यात आली होती. सदर बैठकीमध्ये झालेल्या चर्चेनुसार जुन्या शाळांमध्ये प्रवेशित विद्यार्थ्यांच्या शैक्षणिक प्रगतीबाबत आढावा घेणे, तसेच संबंधित शाळेच्या शैक्षणिक दर्जाची खात्री केल्यानंतर वाढीव विद्यार्थी देण्याबाबत निर्णय घेण्यात यावा, असे निर्देश दिनांक १४.०७.२०२१ रोजी झालेल्या बैठकीत देण्यात आले आहे. त्यानुसार अपर आयुक्त, आदिवासी विकास, नागपूर यांच्या कार्यक्षेत्रातील सदर योजनेंतर्गत यापूर्वी निवड करण्यात आलेल्या शाळांचे प्रचलित निकषांनुसार गुणांकन करण्यात येऊन सदर नामांकित शाळांमध्ये नवीन विद्यार्थी प्रवेशित न करता यापूर्वी प्रवेशित असलेले विद्यार्थी

सन २०२१-२२ करीता कायम ठेवण्याबाबत निर्णय घेण्यात येत आहे. सदर शाळांची यादी खालीलप्रमाणे आहे :-

| अ. क्र. | प्रकल्प कार्यालयाचे नाव | संस्थेचे नाव | नामांकित निवासी शाळेचे नाव व पत्ता |
|---|---|---|---|
| १ | अहेरी | जय बजरंग व्यायाम प्रसारक मंडळ, सिरोंचा, ता. सिरोंचा, जि. गडचिरोली | ज्ञानदिप इंग्लिश मिडीयम स्कूल, सिरोंचा, ता. सिरोंचा, जि. गडचिरोली |
| २ | अहेरी | श्री. दत्ता मेघे बाल कल्याण शिक्षण संस्था, वर्धा | स्कूल ऑफ स्कॉलर्स, सावंगी मेघे, वर्धा |
| ३ | भंडारा | पोद्दार एज्युकेशन ट्रस्ट, डॉ. आंबेडकर मार्ग, परेल, मुंबई | पोद्दार इंटरनॅशनल स्कूल, भंडारा |
| ४ | चंद्रपूर | सरस्वती बहुउद्देशिय शिक्षण प्रसारक मंडळ, बल्लारपूर, जि. चंद्रपूर | गुरुनानक पब्लिक स्कूल, बल्लारपूर, जि. चंद्रपूर |
| ५ | चंद्रपूर | सर्च फाऊंडेशन, चंद्रपूर, ता. चंद्रपूर, जि. चंद्रपूर | स्कॉलर्स सर्च ॲकडमी, कोरपना, ता. चंद्रपूर, जि. चंद्रपूर |
| ६ | चंद्रपूर | स्वामी विवेकानंद शिक्षण संस्था, भद्रावती, जि. चंद्रपूर | फेअरीलॅन्ड स्कूल, भद्रावती, जि. चंद्रपूर |
| ७ | चिमुर | समिधा सेवा संस्था, नागभिड, जि. चंद्रपूर | ट्विंकल इंग्लिश मिडीयम स्कूल, नागभिड, जि. चंद्रपूर |
| ८ | चिमुर | एकात्मता शिक्षण संस्था, ब्रम्हपूरी | हिंदुज्ञान मंदीर, ब्रम्हपुरी, डॉ. बाबासाहेब आंबेडकर चौक, सिव्हील लाईन, गुजरीवार्ड, ब्रम्हपूरी |
| ९ | देवरी | संतोष बहुउद्देशिय शिक्षण संस्था, कुडवा, जि. गोंदिया | ॲक्युट पब्लिक स्कूल, पुटंगीकला, जि. गोंदिया |
| १० | देवरी | श्री गुरुदेव आदिवासी शिक्षण प्रसारक मंडळ, ता. गोरेगाव, जि. गोंदिया | किरसान इंटरनॅशनल स्कूल, गणखेरा, ता. गोरेगाव, जि. गोंदिया |
| ११ | देवरी | पवन शिक्षण संस्था, गोंदिया, जि. गोंदिया | लिटल फ्लॉवर्स इंग्लिश स्कूल, गोंदिया |
| १२ | देवरी | पोद्दार एज्युकेशन ट्रस्ट, डॉ. आंबेडकर मार्ग, परेल, मुंबई | पोद्दार इंटरनॅशनल स्कूल, गोंदिया |
| १३ | देवरी | मागासवर्गीय बहुउद्देशिय संस्था, रेंगेपार/कोहळी, ता. लाखणी, जि. भंडारा | पूर्ती पब्लिक स्कूल, सालेकसा, जि. गोंदिया |
| १४ | देवरी | श्रीमती उमाबाई बहुउद्देशिय शिक्षण संस्था, गोंदिया | प्रोग्रेसिव्ह कॉन्व्हेंट, गौतम नगर गोंदिया |
| १५ | देवरी | श्रीमती उमाबाई बहुउद्देशिय शिक्षण संस्था, गोंदिया | प्रोग्रेसिव्ह इंग्लिश स्कल, चुलोद रोड, गोंदिया |

| | | | |
|---|---|---|---|
| १६ | गडचिरोली | गोडवाना सैनिकी संस्था, गडचिरोली | गोंडवाना सैनिकी विद्यालय, गडचिरोली |
| १७ | नागपूर | राधास्वामी विविध शैक्षणिक संस्था, नागपूर | आदर्श संस्कार विद्यालय, नंदनवन, नागपूर |
| १८ | नागपूर | राधास्वामी विविध शैक्षणिक संस्था, नागपूर | आदर्श संस्कार विद्यालय, पिंपळा, हुडकेश्वर रोड, नागपूर |
| १९ | नागपूर | सेंट्रल हिंदु मिलीटरी एज्यूकेशन सोसायटी, नागपूर | भोसला इंग्लिश स्कूल, नागपूर |
| २० | नागपूर | विद्याप्रबोधिनी बहुउद्देशिय शिक्षण संस्था, नागपूर | सेंट्रल प्रोव्हेन्सियल स्कूल, रामेश्वरी, नागपूर |
| २१ | नागपूर | एस. जी. आर. सन्स एज्युकेशन फाऊंडेशन, नागपूर | जी. एच. रायसोनी विद्यानिकेतन, सुकळी, ता. हिंगणा, जि. नागपूर |
| २२ | नागपूर | श्री. बालाजी बहुउद्देशिय शिक्षण संस्था, नागपूर | रॉय इंग्लिश स्कूल ॲन्ड ज्यु. कॉलेज, नागपूर |
| २३ | नागपूर | महारीजनल बोर्ड ऑफ एज्यूकेशन ॲन्ड द चर्च ऑफ नॉर्थ इंडिया, नागपूर | सेंट ऊर्सुला गर्ल्स हायस्कूल, सिव्हील लाईन, नागपूर |
| २४ | नागपूर | सातपुडा एज्युकेशन सोसायटी, हनुमाननगर, नागपूर | द रॉयल गोंडवाना पब्लिक स्कूल, शंकरपूर, नागपूर |
| २५ | नागपूर | स्नेहा महिला विकास संस्था, नागपूर | तुली पब्लिक स्कूल, कोराडी रोड, नागपूर |
| २६ | नागपूर | श्री. बालाजी शिक्षण संस्था, एम.आय.डी.सी. बुटीबोरी, नागपूर | श्री दत्त विद्या मंदीर, बुटीबोरी, नागपूर |
| २७ | वर्धा | राष्ट्रीय युवा उदय संस्था, नागपूर | लेट राजीव गांधी मेमोरीयल इंग्लिश हायस्कूल ॲन्ड ज्यू. कॉलेज, कारंजा (घा.), जि. वर्धा |
| २८ | वर्धा | लेट श्री. राजसिंग डुंगरपूर मेमो. फाऊंडेशन, तळेगाव | इन्नोवेटीव्ह माईंड स्कूल ऑफ एक्सलन्स, तळेगाव, ता. आष्टी, जि. वर्धा |
| २९ | वर्धा | महिला विकास संस्था, वर्धा | स्कूल ऑफ ब्रिलियंटस, नागलवाडी, वर्धा |
| ३० | नागपूर | एस. जी. आर. सन्स एज्युकेशन फाऊंडेशन, नागपूर | जी. एच. रायसोनी विद्यानिकेतन, अंबाझरी, हिंगणा रोड, जि. नागपूर (डे बोर्डींग) |
| ३१ | नागपूर | पोद्दार एज्युकेशन ट्रस्ट, परेल, मुंबई | पोद्दार इंटरनॅशनल स्कूल, कोराडी रोड, गोधनी, नागपूर (डे बोर्डींग) |

२. अपर आयुक्त, आदिवासी विकास, नागपूर यांच्या कार्यक्षेत्रातील सदर योजनेअंतर्गत यापूर्वी निवड करण्यात आलेल्या तथापि, योजनेअंतर्गत शाळा निवडीचे प्रचलित निकष पूर्ण न करणे, भौतिक सोयी सुविधांचा अभाव, कमी गुणांकन असलेल्या १४ शाळांची योजनेअंतर्गत मान्यता रद्द करण्याचा निर्णय घेण्यात येत आहे. सदर शाळा खालील प्रमाणे आहे.

| अ. क्र. | प्रकल्प कार्यालयाचे नाव | संस्थेचे नाव | नामांकित निवासी शाळेचे नाव व पत्ता |
|---|---|---|---|
| १ | अहेरी | श्री. मल्लाजी आत्राम बहुउद्देशिय संस्था, आलापल्ली | ग्लोबल मिडीया केरला मॉडेल स्कूल, आलापल्ली, जि. गडचिरोली |
| २ | अहेरी | श्रीराम बहुउद्देशिय शिक्षण संस्था, ता. आल्लापल्ली, जि. गडचिरोली | ग्रीन लॅन्ड इंग्लिश मिडीयम स्कूल, आलापल्ली, जि. गडचिरोली |
| ३ | भामरागड | विद्यानिकेतन शिक्षण संस्था, ता. सेलू, जि. वर्धा | गुंज कॉन्व्हेंट स्कूल, सिंदी रेल्वे ता. सेलू, जि. वर्धा |
| ४ | चंद्रपूर | सेमाना विद्या व वनविकास प्रशिक्षण मंडळ, गडचिरोली, जि. गडचिरोली | देवयानी इंटरनॅशनल स्कूल, सिंदेवाही, ता. सिंदेवाही, जि. चंद्रपूर |
| ५ | चंद्रपूर | तेरा प्रेम चर्च सोसायटी, वरुर रोड, ता. राजूरा, जि. चंद्रपूर | लुअर्द माता विद्या मंदीर, राजूरा, जि. चंद्रपूर |
| ६ | चंद्रपूर | कै. बापूजी मामुलकर पाटील स्मृती प्रतिष्ठाण, राजूरा, जि. चंद्रपूर | सोनिया गांधी इंग्लिश पब्लिक स्कूल, राजूरा, जि. चंद्रपूर |
| ७ | देवरी | गणेश ग्रामीण शिक्षण संस्था, गोंदिया, जि. गोंदिया | ज्ञानयोगी डॉ. श्रीकांत जिचकार मॉडेल स्कूल, किंडगीपार, ता. जि. गोंदिया |
| ८ | देवरी | प्रताप मेमोरियल चॅरिटेबल ट्रस्ट, गोंदिया | आर्चीड इंटरनॅशनल पब्लिक स्कूल, सुर्याटोला, ता. गोंदिया |
| ९ | देवरी | श्रीमती उमाबाई बहुउद्देशिय शिक्षण संस्था, गोंदिया | प्रोग्रेसिव्ह इंटरनॅशनल स्कूल, पांगोली रोड, चुलोद, गोंदिया |
| १० | गडचिरोली | श्रीकृष्ण बहुउद्देशिय समिती, आरमोरी, जि. गडचिरोली | पॅराडाईज इंग्लिश मिडीयम स्कूल, आरमोरी, जि. गडचिरोली |
| ११ | नागपूर | नवजीवन संस्था, नागपूर | डॉ. टी. एस. विल्कीन्सन्स, गोधनी, नागपूर |
| १२ | नागपूर | ज्ञानदिप मल्टीपर्पज एज्युकेशन सोसायटी, रामटेक, जि. नागपूर | ज्ञानदीप कॉन्व्हेंट ॲन्ड ज्यू. कॉलेज ऑफ सायन्स, शितलवाडी, रामटेक |
| १३ | नागपूर | W.C.L. कामगार बहुउद्देशिय शिक्षण संस्था, पाटणसावंगी,ता. सावनेर, जि. नागपूर | हंसकृपा इंग्लिश प्रायमरी ॲन्ड हायर सेंकडरी स्कूल, गोधणी, नागपूर |
| १४ | वर्धा | प्रगतीशील बहुउद्देशीय संस्था, वाशिम | एंजल पॅराडाईज इंग्लिश मिडीयम स्कूल, केळझर, ता. सेलु |

३. उपरोक्त परिच्छेद २ मधील तक्त्यात दर्शविल्याप्रमाणे अपर आयुक्त, आदिवासी विकास, नागपूर यांच्या कार्यक्षेत्रातील सदर योजनेअंतर्गत मान्यता रद्द होत असलेल्या १४ नामांकित शाळांतील विद्यार्थ्यांचे अनुक्रमे (१) एकलव्य इंग्रजी माध्यमाच्या शाळा (२) शासकीय इंग्रजी माध्यमाच्या शाळा (३) जून्या दर्जेदार नामांकित निवासी शाळांमध्ये समायोजन करण्याबाबतचा प्रस्ताव अपर आयुक्त, आदिवासी विकास, नागपूर यांनी ७ दिवसात आयुक्त, आदिवासी विकास, नाशिक यांच्यामार्फत शासनास सादर करावा.

४. नामांकित निवासी शाळा योजनेंतर्गत प्रचलित सर्व शासन निर्णय तसेच शासन नियमांचे काटेकोरपणे पालन करावे. तसेच सदर तरतुदींचे पालन न करणाऱ्या शाळांची मान्यता रद्द करण्यात येईल.

५. सदर योजनेची अंमलबजावणी संबंधित प्रकल्प अधिकारी करतील. तसेच अपर आयुक्त, आदिवासी विकास, नागपूर हे या योजनेचे “पर्यवेक्षकीय अधिकारी” म्हणून व आयुक्त, आदिवासी विकास नाशिक हे “नियंत्रक अधिकारी” म्हणून जबाबदारी पार पाडतील.

६. सदर योजनेसाठी होणारा खर्च खालील लेखाशिर्षाखाली करण्यात यावा.

“मागणी क्र. टी-५
२२२५-अनुसूचित जाती, अनुसूचित जमाती व इतर मागास वर्ग यांचे कल्याण-
पंचवार्षिक योजनेंतर्गत योजना- जनजाती क्षेत्र उपयोजना-
०२ अनुसूचित जमातीचे कल्याण
७९६, जनजाती क्षेत्र उपयोजना-राज्य योजनांतर्गत योजना
(०२) जनजाती क्षेत्राबाहेरील उपयोजना
(०२) (२९) अनुसूचित जमातीच्या विद्यार्थ्यांना इंग्रजी माध्यमाच्या नामांकित शाळांमध्ये शिक्षण देणे.
(२२२५ सी-९९९) ३१ “सहायक अनुदाने (वेतनेतर)”

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेत स्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२११२०३१७५९३३४६२४ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

VIJESING FATTESING VASAVE

Digitally signed by VIJESING FATTESING VASAVE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=TRIBAL DEVELOPMENT DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=c4f0e8608020fad0064f5bd3c615be5666dc0af54fcf5038cc18559d51a472ba, pseudonym=DDE30B7B971C12AC5E78F6BE2C672CA11B7A98CE, serialNumber=2182F4F20DAA6841AB430B2FD812E7B5D3A883E72EFA574CA5E29FF528BC8015, cn=VIJESING FATTESING VASAVE
Date: 2021.12.03 18:03:23 +05'30'

**( वि. फ. वसावे )**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१) मा. राज्यपाल यांचे सचिव, राजभवन, मुंबई,
२) मा. मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई,
३) मा. मंत्री (आदिवासी विकास) यांचे खाजगी सचिव,
४) मा. राज्यमंत्री (आदिवासी विकास) यांचे खाजगी सचिव,
५) अपर मुख्य सचिव, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई,
६) अपर मुख्य सचिव, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, मंत्रालय, मुंबई,
७) सचिव, आदिवासी विकास विभाग, मंत्रालय, मुंबई,
८) महालेखापाल-१/२ (लेखा व अनुज्ञेयता)/(लेखापरिक्षा), मुंबई / नागपूर,
९) आयुक्त, आदिवासी विकास आयुक्तालय, नाशिक,
१०) अपर आयुक्त, आदिवासी विकास, नाशिक / ठाणे / अमरावती / नागपूर,
११) सर्व प्रकल्प अधिकारी, एकात्मिक आदिवासी विकास प्रकल्प,
१२) सर्व जिल्हा कोषागार अधिकारी,
१३) सर्व संबंधित संस्था/शाळा (संबंधित प्रकल्प अधिकारी यांच्यामार्फत),
१४) निवड नस्ती (कार्या-१२).